कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील अशासकीय अनुदानित कला संस्थामधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना खालील सेवाविषयक लाभ देण्याबाबत.

१. अर्जित रजेचे रोखिकरण
२. महिला कर्मचाऱ्यांना प्रसुती रजा
३. पक्षाघात झालेल्या कर्मचाऱ्यांना रजा सवलत

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. एडीआर-२०१८/प्र.क्र.११०/१८(भाग २)/तांशि-६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- १९ एप्रिल, २०२२

**प्रस्तावना :-**

शालेय शिक्षण विभागाच्या नियंत्रणाखालील अशासकीय अनुदानित शाळांमधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना, विविध २३ शासन निर्णयांनुसार मिळणारे लाभ, अशासकीय अनुदानित कला संस्थामधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना लागू करावे, याकरिता मुंबई उच्च न्यायालय येथे रिट याचिका क्र. २८१७/२०१४ व उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे याचिका क्र. ३८७२/२००५ दाखल करण्यात आल्या होत्या. याचिकाकर्त्यांच्या मागण्या मान्य करुन सदर याचिका अनुक्रमे दिनांक ५ ऑक्टोबर, २०१७ व दिनांक २६ फेब्रुवारी, २०१८ च्या आदेशान्वये मा. न्यायालयाने निकाली काढल्या आहेत. मा. न्यायालयाच्या आदेशांची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने अशासकीय अनुदानित कला संस्थांमधील पात्र शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना अर्जित रजेचे रोखीकरण, महिला कर्मचाऱ्यांना प्रसुती रजा, पक्षाघात झालेल्या कर्मचाऱ्यांना रजाविषयक सवलत लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत दिनांक ३१ मार्च,२०२२ रोजी राज्य मंत्रिमंडळाच्या बैठकीमध्ये चर्चा झाली असून पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे:-

**शासन निर्णय :-**

अशासकीय अनुदानित कला संस्थामधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना खालील लाभ या शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू करण्यात येत आहेत.

१) अर्जित रजेचे रोखीकरण :-

वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक अरजा-२४०१/७/सेवा-९, दि. १५ जानेवारी, २००१ अन्वये शासकीय कर्मचाऱ्यांना अर्जित रजा प्रत्यार्पणाची देण्यात आलेली सवलत दि. १ फेब्रुवारी, २००१ पासून बंद करण्यात आली आहे. अरजा-२४०१/८/सेवा-९, दि. १५ जानेवारी, २००१ अन्वये शासकीय कर्मचाऱ्यांकरिता अर्जित रजेचे रोखीकरण करण्याची मर्यादा ३०० दिवसांपर्यंत वाढविण्यात आली आहे. तसेच, वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक अरजा-२००९/प्र.क्र.२१/सेवा-६, दि. २७ ऑगस्ट, २००९ आणि शासन पूरक पत्र क्रमांक अरजा-२००९/प्र.क्र.२१/सेवा-६, दि. १० नोव्हेंबर, २००९ अन्वये अर्जित रजेचे रोखीकरण सुधारीत वेतन संरचनेनुसार करण्यास मान्यता देण्यात आली आहे. वित्त विभागाच्या

उपरोक्त शासन निर्णयातील तरतुदी, वित्त विभागाकडून भविष्यात केल्या जाणाऱ्या सुधारणांसह, या शासन निर्णयाच्या दिनांकापासून, अशासकीय अनुदानित कला संस्थामधील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना लागू करण्यात येत आहेत.

२) महिला शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना प्रसुती रजा :-

वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक अरजा - १४०९/प्र.क्र.८/०९/सेवा-६, दि. २४ ऑगस्ट, २००९ अन्वये राज्य शासकीय महिला कर्मचाऱ्यांची प्रसूती रजेची मर्यादा १८० दिवस करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयामधील तरतुदी वित्त विभागाकडून भविष्यात केल्या जाणाऱ्या सुधारणांसह अशासकीय अनुदानित कला संस्थांमधील महिला शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना, या शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू करण्यात येत आहेत.

३) कॅन्सर / पक्षाघात झालेल्या कर्मचाऱ्यांना रजा सवलत :-

अशासकीय अनुदानित कला संस्थामधील कॅन्सर / पक्षाघात झालेल्या शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम ७९ परिशिष्ट तीन मधील तरतुदी या शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू करण्यात येत आहेत.

उपरोक्त लाभ मा.न्यायालयांनी दिलेल्या आदेशांची अंमलबजावणी करण्यासाठी अनुज्ञेय करण्यात येत आहेत. त्यामुळे सदर निर्णय केवळ अशासकीय अनुदानित कला संस्थांमधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना लागू राहतील.

सदरचा शासन निर्णय दिनांक ३१ मार्च,२०२२ रोजी राज्य मंत्रिमंडळाच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २४७/सेवा-६ दिनांक ५ ऑक्टोबर,२०१९ आणि ४४/२०२२/व्यय-५ दिनांक १२ जानेवारी,२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२२०४१९१२४४५८२५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Rajaram Utekar

Digitally signed by Sandesh Rajaram Utekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher & Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=009789e9fe23fde06096381e43bebecd32b5c692c899745eee7d89d805005a87, cn=Sandesh Rajaram Utekar
Date: 2022.04.19 12:48:29 +05'30'

**( सं. रा. उतेकर )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन मुंबई.

४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन मुंबई.
५. मा.राज्य मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल, महाराष्ट्र ( लेखा व अनुज्ञेयता ) , महाराष्ट्र १ / २, मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल ( लेखा परिक्षा), महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर.
८. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
९. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व सह / उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कला संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / औरंगाबाद,
१५. निरीक्षक, चित्रकला व शिल्प, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१६. वित्त विभाग (सेवा-९), मंत्रालय, मुंबई,
१७. निवड नस्ती, उच्च व तंत्र शिक्षण विभाग (तांशि-६).